**राज्यातील इ.१ ली ते इ. ९ वी व इ. ११ वी च्या शाळा पूर्ण क्षमतेने सुरू करण्यास, तसेच शाळांची वेळ व कार्यकाळाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण : २०२१/प्र.क्र.१७८/एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : - २४ मार्च, २०२२.

<u>वाचा</u> :-१) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.८६/एसडी-६, दि. १५ जून, २०२०
२) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.८६/एसडी-६, दि. २४ जून, २०२०.
३) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.८६/एसडी-६, दि. २२ जुलै, २०२०.
४) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.८६/एसडी-६, दि. १७ ऑगस्ट, २०२०.
५) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.८६/एसडी-६, दि. २९ ऑक्टोबर, २०२०.
६) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण२०२१/प्र.क्र.९४/एसडी-६, दि.०७ जुलै, २०२१.
७) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२१/प्र.क्र.११३/एसडी-६, दि. १० ऑगस्ट, २०२१.
८) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२१/प्र.क्र.११३/एसडी-६, दि. २४ सप्टेंबर, २०२१.
९) आरोग्य सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्रमांक संआसे/कोविड/शाळा सुरु होण्यासंदर्भात सूचना/२५६०२-७१०/२०२१, दि. २८ नोव्हेंबर २०२१
१०) शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण : २०२१/प्र.क्र.१७८/एसडी-६,दि. २९ नोव्हेंबर, २०२१
११) महाराष्ट्र शासन, आपत्ती व्यवस्थापन विभाग, आदेश क्र.डीएमयू/२०२०/ सीआर ९२/ डीआयएसएम-१, दि.८ जानेवारी, २०२२.
१२) शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१७८/एसडी-६, दि. २० जानेवारी, २०२२.
१३) प्राथमिक शिक्षण संचालनालय, पत्र क्र. प्राशिसं / संचमान्यता/२०२२/ टे-५२०/७०६, दि.२५ फेब्रुवारी, २०२२.

<u>परिपत्रक :-</u>

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक, दि. ७ जुलै २०२१ अन्वये ग्रामीण भागातील कोरोनामुक्त गावात इ. ८ वी ते इ.१२ वीचे व दि.१० ऑगस्ट २०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये ग्रामीण भागात इ.५ वी ते इ.७ वी व शहरी भागातील इ. ८ वी ते इ. १२ वी तसेच दि.२४ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये शैक्षणिक वर्ष २०२१-२०२२ मध्ये राज्यातील ग्रामीण भागातील इयत्ता पाचवी ते इयत्ता बारावी व शहरी भागातील इयत्ता आठवी ते बारावीच्या शाळा दि.०४ ऑक्टोबर, २०२१ पासून सुरु करण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. एकूणच राज्यातील कोरोनाचा प्रादुर्भाव दिवसेंदिवस कमी होत असल्याने राज्यातील ग्रामीण भागातील इयत्ता १ ली ते इयत्ता ४ थी व महापालिका हद्दीतील इयत्ता १ ली ते ७ वी चे वर्ग दि. ०१ डिसेंबर, २०२१ रोजी पासून सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. दरम्यान राज्यात कोरोनाचा वाढता प्रादुर्भाव विचारात घेऊन संदर्भ क्र.११ येथील आदेशान्वये आपत्ती व्यवस्थापन विभागाने राज्यातील सर्वच शाळा दि.१५ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत बंद करण्याचे आदेश निर्गमित करण्यात आले होते. तथापि, कोरोनाचा वाढता प्रादुर्भाव राज्याच्या सर्व भागात सारख्या प्रमाणात नसल्याने व राज्यातील ज्या ठिकाणी कोरोनाचा प्रादुर्भाव कमी आहे, अशा भागातून शाळा सुरु करण्याबाबत सातत्याने

मागणी करण्यात येत असल्याने दिनांक २० जानेवारी, २०२२ रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यातील इ.१ ली ते १२ वी च्या शाळा स्थानिक परिस्थितीचा विचार करुन दि. २४ जानेवारी २०२२ पासून पुन्हा सुरु करण्याचे अधिकार महानगरपालिका क्षेत्रात महानगरपालिका आयुक्त व राज्यातील इतर भागात जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना शाळा सुरु करण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

२. राज्यातील कोरोनाचा प्रादुर्भाव दिवसेंदिवस कमी होत असून राज्यातील सर्व आस्थापना / कार्यक्रमांवरील कोरोना विषयक निर्बंध टप्प्या-टप्प्याने उठविण्यात येत आहेत. कोरोनाच्या प्रादुर्भावामुळे विद्यार्थ्यांचे झालेले शैक्षणिक नुकसान भरून काढण्यासाठी शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे:-

२.१. सर्वसाधारणपणे दरवर्षी माहे मार्चपासून सकाळच्या सत्रात शाळा भरण्यास परवानगी दिली जाते. या शैक्षणिक वर्षात मार्च पासून एप्रिल अखेरपर्यंत सकाळच्या सत्रात शाळा सुरू करण्याऐवजी इयत्ता १ ली ते ९ वी व इयत्ता ११ वी चे वर्ग असणाऱ्या शाळा पूर्णवेळ सुरू ठेवण्यात याव्यात.

२.२. माहे एप्रिल अखेरपर्यंत शनिवारी पूर्णवेळ शाळा सूरू ठेवाव्यात. तसेच रविवारी ऐच्छिक स्वरूपात शाळा सूरू ठेवता येईल.

२.३. इयत्ता १ ली ते ९ वी व इयत्ता ११ वी च्या वर्गातील विद्यार्थ्यांच्या परीक्षा माहे एप्रिल महिन्यातील ३ ऱ्या आठवड्यात घेण्यात याव्यात व निकाल मे महिन्यात जाहीर करण्यात यावा.

२.४. सकाळच्या सत्रात शाळा घेणे आवश्यक असल्यास अध्यापनाच्या तासिका पूर्णवेळ शाळेप्रमाणे घेण्यात याव्यात.

२.५. दररोज १०० टक्के विद्यार्थी उपस्थित राहण्यास परवानगी देण्यात येत आहे.

३. यापूर्वी दिनांक २० जानेवारी, २०२२ रोजीच्या परिपत्रकान्वये महानगरपालिका क्षेत्रात महानगरपालिका आयुक्त व राज्यातील इतर भागात जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांना देण्यात आलेले अधिकार अबाधित राहतील.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३२४१५५२३४४३२१ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2022.03.24 15:54:00 +05'30'

**( इ. मु.काझी )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,

३) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,

४) मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई,
५) मा.उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई,
६) मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन , मुंबई,
७) मा.उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई,
८) मा. मंत्री ( शालेय शिक्षण )यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) मा. राज्यमंत्री, ( शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, जी.टी. हॉस्पीटल, मुंबई,
१२) प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४) सर्व महानगरपालिका आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी,
१६) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई,
१७) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे,
१८) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई,
१९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२०) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२१) संचालक, बालभारती,
२२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
२३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व),
२४) मुख्याधिकारी, नगरपालिका, (सर्व),
२५) जिल्हा आरोग्य अधिकारी, (सर्व),
२६) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) (सर्व),
२७) प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (सर्व),
२८) प्रशासन अधिकारी, महानगरपालिका (सर्व),
२९) निवडनस्ती (कार्या.एसडी-६).

*********************